**राज्य योजना सन २०१६-१७ निसर्ग पर्यटन योजने अंतर्गत चालू बाब प्रस्ताव.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १८ जानेवारी, २०१७.

वाचा :-

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक ०१.४.२०१६.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६.
३. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१, दिनांक :- ०३.०८.२०१६.
४. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१, दिनांक :- २०.०९.२०१६.
५. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१, दिनांक :- १७.१०.२०१६.
६. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१, दिनांक :- २५.१०.२०१६.
७. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१, दिनांक :- १८.११.२०१६.
८. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१, दिनांक :- २९.१२.२०१६.
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. २८(१६-१७)/१९०७/१६-१७, दिनांक १०.०१.२०१७.

प्रस्तावना :-

सन २०१६-१७ राज्यस्तरीय योजनेतंर्गत निसर्ग पर्यटन योजना (२४०६-२२९५) या लेखाशिर्षांतर्गत संरक्षित क्षेत्र व इतर वनक्षेत्रातील निसर्ग पर्यटनासाठी रुपये ५६७४.८८ लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वेळोवेळी सादर केलेल्या प्रस्तावांनुसार निसर्ग पर्यटन योजना (२४०६-२२९५) या योजनेतर्गत संदर्भीय शासन निर्णय क्र.३, ४, ५, ६, ७ व ८ अन्वये संरक्षित क्षेत्राकरता रु. ३०७२.४० लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे.

संदर्भ क्रमांक ९ च्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी निसर्ग पर्यटन योजना (२४०६-२२९५) या योजनेतर्गत संरक्षित क्षेत्रांकरीता रु. १३५.०० लक्षचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

उक्त योजनेमधील विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या ८० % मर्यादेत निधी माहे डिसेंबर, २०१६ पर्यत खर्च करण्यास **" अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च - योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक नाही "** या अटीवर खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ९ च्या पत्रान्वये भिमाशंकर येथे महादेव वन उभारण्याच्या अनुषंगाने सादर केलेल्या रु. १३५.०० लक्षच्या प्रस्तावापैकी निधीची उपलब्धता पहाता खालील अटींच्या अधीन राहून **रुपये ७२.६८ लक्ष निधी** खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१६-१७ मध्ये लेखाशिर्ष क्र.२४०६ वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे प्राप्त होणाऱ्या निधीतून सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खर्च करण्यात यावी.

२. योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे, याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबीवर निधी खर्ची टाकण्यात यावा आणि याची जबाबदारी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) यांची राहील.

३. कार्यबाबीमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पद्धतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

४. सदर कामे करताना भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ व वन (संवर्धन) अधिनियम १९८० चा भंग होणार नाही या अटीवर मंजूरी देण्यात येत आहे.

५. केंद्र शासन व राज्य शासनाचे निसर्ग पर्यटन धोरणाशी अनुकूल राहतील अशीच कामे कार्यान्वित करावी.

६. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

७. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक :- १७.०४.२०१५ व क्रमांक :- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक:- २०.०४.२०१६ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११८१६५३१३३५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, serialNumber=2972090f5c611c22111cacebf1c55ba326016fa7107614a6b256203dbb7235cd, cn=Arvind Shankar Apte
Date: 2017.01.18 16:58:29 +05'30'

( अरविंद आपटे )
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति :**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन मंडळ, नागपूर
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
६. मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे.
७. महालेखापाल १ व २ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८. निवड नस्ती, फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.

********

**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०७.१६/प्र.क्र. २२५ /फ-१, दिनांक :- १८ जानेवारी, २०१७ सोबतचे विवरणपत्र.**

**(रक्कम रुपये लाखात)**

| प्रधान शिर्ष | सविस्तर शिर्ष | जानेवारी, २०१७ | एकूण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| २४०६ २२९५ | ०२-मजुरी | १६.७२ | १६.७२ |
| | २१- पुरवठा व सामग्री | १३.०८ | १३.०८ |
| | २७-लहान बांधकामे | ४.३६ | ४.३६ |
| | ५०-इतर खर्च | ३८.५२ | ३८.५२ |
| | **एकूण** | **७२.६८** | **७२.६८** |

*****